सन २०२२-२३ करीता सहकारी साखर कारखान्यांना कर्जे या योजनेतर्गत श्री. सिध्देश्वर सहकारी साखर कारखाना लि., कुमठे, पो. टिकेकरवाडी ता. दक्षिण सोलापूर, जि. सोलापूर या कारखान्यास ऊस खरेदी कराचे बिनव्याजी कर्जात रूपांतर करण्यास मंजूरी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ससाका-२०१८/प्र.क्र.०८/३-स**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३० मे, २०२३.

**संदर्भ:-** १. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक:- ससाका-२०१८/प्र.क्र.०८(शिकाना)/३-स, दि.१५.०२.२०२०.
२. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक:- ससाका-२०१८/प्र.क्र.०८(शिकाना)/३-स, दि.३१.०१.२०२३

**प्रस्तावना :-**

नवीन सहकारी साखर कारखान्यांनी पहिल्या पाच वर्षात प्रत्यक्ष गाळप केलेल्या तसेच विस्तारवाढ केलेल्या सहकारी साखर कारखान्यांनी केलेल्या वाढीव गाळपावरील ऊसावरील ऊस खरेदी कर भरण्याऐवजी सदर रकमेचे बिनव्याजी कर्जात रुपांतर करण्याचे शासनाचे धोरण आहे. या धोरणानुसार बिनव्याजी कर्जात रुपांतर करण्यास अनुज्ञेय असलेल्या श्री सिध्देश्वर सहकारी साखर कारखाना लि., कुमठे, पो. टिकेकरवाडी, ता. दक्षिण सोलापूर, जि. सोलापूर या साखर कारखान्याच्या एकूण ऊस खरेदी कराच्या रू. ७,२२,२२,६८७/- पैकी रु.५,५६,८२,१५३/- (अक्षरी रुपये पाच कोटी छपन्न लाख ब्याऐंशी हजार एकशे त्रेपन्न फक्त) एवढया रकमेचे बिनव्याजी कर्जात रुपांतर करण्यास सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या शासन निर्णय दि.१३.११.२०१८ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. एकूण ऊस खरेदी करापैकी उर्वरित रक्कम रु.१,६५,४०,५३४/- (एक कोटी पासष्ट लाख चाळीस हजार पाचशे चौतीस फक्त) एवढ्या रक्कमेचे बिनव्याजी कर्जात रुपांतर करण्यास संदर्भाधीन दि.१५.०२.२०२० व दि.३१.०१.२०२३ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. मात्र, सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता मंजूर झालेल्या तरतूदीतून सदर खर्च निधीअभावी भागविता आला नाही. तसेच, सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात सदर रक्कम खर्ची न पडल्याने सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात वितरणास अनुज्ञेय असलेला निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. श्री सिध्देश्वर सहकारी साखर कारखाना लि. कुमठे जि. सोलापूर या कारखान्याची सन २००९-१० ची ऊस खरेदी कराची उर्वरीत रू.१,६५,४०,५३४/- वितरणाचा प्रस्ताव आहे. मात्र, सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात प्रस्तुत प्रयोजनाच्या लेखाशिर्षाखाली रु.०४,९६,७८,०००/- इतकी रक्कम अर्थसंकल्पित असून या रक्कमेपैकी बी.डी.एस. प्रणालीवर वितरणास उपलब्ध असलेली १०% म्हणजेच रु.४९,६७,८००/- (एकोपन्नास लाख सदुसष्ट हजार आठशे फक्त) इतकी रक्कम बिनव्याजी कर्जात रुपांतर करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. श्री. सिध्देश्वर सहकारी साखर कारखाना लि., कुमठे, पो. टिकेकरवाडी, ता. दक्षिण सोलापूर, जि. सोलापूर या कारखान्यांना मंजूर करावयाचा निधी, आर्थिक वर्ष इत्यादीबाबतची माहिती ऊस खरेदी कराच्या रकमेचा तपशील खालील प्रमाणे आहे:-

| | **सन** | **ऊस खरेदी कराचे बिनव्याजी कर्जात रूपांतरण होण्यास पात्र रक्कम** | **शासन निर्णयदि. १३.११.२०१८अन्वये ऊस खरेदी कराचे बिनव्याजी कर्जात रूपांतर** | **या शासन निर्णयान्वये करण्यात येणाऱ्या ऊस खरेदी कराचे बिनव्याजी कर्जात रूपांतर** |
|---|---|---|---|---|
| श्री. सिध्देश्वर सहकारी साखर कारखाना कुमठे साखर लि., टिकेकरवाडी, दक्षिण सोलापूर,जि. सोलापूर | ०६-२००५ | रु.१,४३,०९,२७९ | रु.१४३०९२७९ | |
| | ०७-२००६ | करमाफ़ी | करमाफ़ी | |
| | ०८-२००७ | रु.१,२१,७१,८४९ | रु.१,२१,७१,८४९ | |
| | ०९-२००८ | रु.१,३०,८१,८९७ | रु.१,३०,८१,८९७ | |
| | १०-२००९ | रु.३,२६,५९,९७० | रु.१,६१,१९,१२८ | रु.१,६५,४०,५३४ |
| | **एकूण** | **रु.७,२२,२२,६८७** | **रु.५,५६,८२,१५३** | **रु.१,६५,४०,५३४** |

३. सदर सहकारी साखर कारखान्याची वरील तक्त्यात दर्शविण्यात आलेल्या सन २००९-१० या गळीप हंगामातील रु.४९,६७,८००/- (एकोपन्नास लाख सदुसष्ट हजार आठशे फक्त) एवढया ऊस खरेदी कराचे बिनव्याजी कर्जात रुपांतर करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. कारखान्याने ऊस खरेदी कराची निर्धारणा विक्रीकर आयुक्त यांचेकडून करुन घ्यावी.

४. वरील प्रमाणे मंजूर केलेली बिनव्याजी कर्जाची एकूण रुपये रू रु.४९,६७,८००/- (एकोपन्नास लाख सदुसष्ट हजार आठशे फक्त) ही रक्कम “मागणी क्रमांक व्ही ५, ६४२५- सहकारासाठी कर्जे, (००) १०८, इतर सहकारी संस्थांना कर्जे, (०३) सहकारी साखर कारखाने, (०३) (०१) सहकारी साखर कारखान्यांना कर्जे (कार्यक्रम) (६४२५ ०१४४), ५५ कर्जे व आगाऊ रकमा" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून संबंधित सहकारी साखर कारखान्याच्या खाती बिनव्याजी कर्ज म्हणून दाखविण्यात यावी. हा खर्च सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर झालेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

५. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पुस्तकी समायोजनाव्दारे ही रक्कम संबंधित सहकारी साखर कारखान्याच्या ऊस खरेदी कराच्या थकबाकीपोटी वसूली म्हणून "००४० विक्री, व्यापार इत्यादीवरील कर १०६ ऊस खरेदीवर कर, (०१) ऊस खरेदीवर कर, (०१) (०१) कर वसुली (००४००३१६)" या लेखाशिर्षाखाली दाखविण्यात यावी.

६. या योजने अंतर्गत ज्या वर्षाच्या ऊस खरेदी करासाठी हे बिनव्याजी कर्ज मंजूर करण्यात आलेले आहे, त्या वर्षाच्या कर्जाची वसुली त्या वर्षापासूनच्या सहाव्या वर्षात ते कर्ज वसूलीस पात्र झालेले आहे असे समजून त्या कर्जाची वसूली पाच समान वार्षिक हप्त्यात करावयाची आहे. त्यानुसार या सहकारी साखर कारखान्याच्या बाबतीत कर्जाचे हप्ते वसूलीस पात्र झालेले आहेत, तथापि, साखर आयुक्त यांनी नमूद केल्यानुसार यापूर्वीचे बिनव्याजी कर्जात रूपांतर झालेली रक्कम रू.५,५६,८२,१५३/- ची परतफेड होण्यास पुरेशी मुदत कारखान्यास मिळालेली नाही तसेच अद्याप सन २००९-१० चा ऊस खरेदी कर रक्कम रु. १,६५,४०,५३४ (अक्षरी रुपये एक कोटी पासष्ट लाख चाळीस हजार पाचशे चौतीस फक्त) एवढया कराचे बिनव्याजी कर्जात रूपांतर होणे बाकी आहे. यास्तव मंजूर रु.४९,६७,८००/- (एकोपन्नास लाख सदुसष्ट हजार आठशे फक्त) ऊस खरेदी कराची रक्कम ही सन २०२३-२४ ची असल्यामुळे सदर कर्जाची मुदत सन

२०२३-२४ या आर्थिक वर्षापर्यंत आहे. त्यामुळे कारखान्याने यापूर्वीची रक्कम व या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेली रक्कम अशी एकूण रु.६,०६,४९,९५३/- सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातच भरणा करावी, सदर रक्कम साखर आयुक्तांनी तात्काळ वसूल करून शासनास भरणा करावी. वरील कर्जाची वसूली पुढील जमा लेखाशिर्ष "६४२५- सहकारासाठी कर्ज,१०८- इतर सहकारी संस्थांना कर्ज (००) (०६) सहकारी साखर कारखान्यांना कर्जे (६४२५५१९१) खाली जमा करावी. यासाठी शासन निर्णय, कृषि व सहकार विभाग क्र. सीएसके- १०७६/६९७४२/१३ सी, दिनांक ०७ एप्रिल, १९९७ अन्वये ठरविण्यात आलेल्या पध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

७. "प्रस्तुत प्रकरणी लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व साखर आयुक्त, पुणे यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच साखर आयुक्त, पुणे यांना असे आदेश देण्यात येत आहे की, श्री. सिध्देश्वर सहकारी साखर कारखाना लि. कुमठे, पो. टिकेकरवाडी, ता. दक्षिण सोलापूर, जि. सोलापूर या कारखान्यास ऊस खरेदी कर भरण्यासाठी मंजूर केलेल्या बिनव्याजी कर्जाची रक्कम सदर कारखान्याच्या ऊस खरेदी कर थकबाकीपोटी संबंधित लेखाशिर्षाखाली समयोजन निरंक रकमेचे देयक कोषागारात सादर करून करण्यात यावे. तसेच, समायोजन पूर्ण झाल्याचा अहवाल विक्रीकर आयुक्त/वित्त विभाग / सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांना पाठवावा.

८. कारखाना बहुराज्यीय झाला असल्याने सदर कर्जाची वसूली होण्यासाठी संचालकांची वैयक्तिक हमी घेण्याच्या तसेच राज्य शासनामार्फत देण्यात येणारे अनुदान (सॉफ्ट लोन २०१५, वाहतुक अनुदान, घट ऊतारा) सदर थकीत कर्जाच्या खाती वळती करण्याबाबत संचालक मंडळाचा ठराव घेवून याबाबातचे बंधपत्र साखर आयुक्त यांनी घेण्याच्या अधीन रक्कम रु.४९,६७,८००/- (एकोपन्नास लाख सदुसष्ट हजार आठशे फक्त) एवढया ऊस खरेदी कराचे बिनव्याजी कर्जात रूपांतरण करण्यास सहमती दर्शविण्यात येत आहे. त्याबाबत योग्य ती दक्षता घेण्यात यावी.

९. प्रमाणित करण्यात येते कि, या प्रकरणी शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०१९/ प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८.०७.२०१९ मधील संबंधित अटींची पूर्तता झाली आहे. साखर आयुक्त, पुणे यांनी सदर तरतूद वितरीत करताना तसेच खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियमपुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच वित्त विभागाच्या दि.०८.०७.२०१९ च्या परिपत्रकातील अटी व शर्तीचे व वेळोवेळी दिलेल्या सुचनांचे पालन करण्याची दक्षता घ्यावी.

१०. सदरहू शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थसं-२०१२/प्र.क्र.९२/ अर्थ-३, दि.०८.०७.२०१९ अन्वये विभागास प्राप्त प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५३०१६१००१३००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL DEORAM AGARKAR

Digitally signed by SUNIL DEORAM AGARKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=bd05f4fdbbb9ed343f1be2caf44a80e981a9aaaa980ed10ed0e2772dfcca67cc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=01A0A8594022E4572C9EE1F979883E0867C70D25B214D7205F60D0D0F23484C9, cn=SUNIL DEORAM AGARKAR
Date: 2023.05.30 16:11:04 +05'30'

( सुनिल आगरकर )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल - १, महाराष्ट्र, मुंबई/ महालेखापाल २, नागपूर.

२. विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई

३. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे

४. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे

५. अप्पर विक्रीकर आयुक्त, पुणे.
६. अवर सचिव (१७स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रादेशिक सहसंचालक (साखर) पुणे.
८. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, सोलापूर.
१०. सहाय्यक विक्रीकर आयुक्त, सोलापूर.
११. वित्त विभाग (कराधान-३/व्यय-२)
१२. कार्यकारी संचालक, श्री. सिध्देश्वर सहकारी साखर कारखाना लि. कुमठे, पो. टिकेकरवाडी, ता. दक्षिण सोलापूर, जि. सोलापूर
१३. निवडनस्ती ३ स.